जनहित याचिका क्रमांक १७३/२०१०. डॉ.महेश बेडेकर वि. महाराष्ट्र शासन व इतर. ध्वनी प्रदूषण नियम, २००० व महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ ची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : डिआयएस ०९१०/प्र.क्र.४३४/वि.शा.१ ब**
दुसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ जुलै, २०१५

वाचा :- मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० मध्ये दिनांक १३.०३.२०१५ व २४.०६.२०१५ रोजी दिलेले आदेश.

**परिपत्रक :-**

जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० (डॉ.महेश बेडेकर विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर) या याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० मधील नियम ५ खालीलप्रमाणे असून त्याच्या आधारे कार्यवाही करण्यात यावी. :-

Restrictions on the use of loud speakers / public address system :-

i. A loud speaker or a public address system shall not be used except after obtaining written permission from the authority.

ii. A loud speaker or a public address system shall not be used at night (between 10.00 a.m. to 6.00 a.m.) except in closed premises for communication within, e.g. auditoria, conference rooms, community halls and banquet halls.

iii. Notwithstanding anything contained in sub rule 2 the state Government may, subject to such to such terms and conditions as are necessary to reduce noise pollution, permit use of loud speakers or public address systems during night

hours (between 10.00 p.m. to 12.00 midnight) on or during any cultural or religious festive occasion of a limited duration not exceeding 15 days in all during a calander year.

२. याशिवाय, ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० ची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने संबंधितांना खालीलप्रमाणे सूचनासुद्धा निर्गमित करण्यात येत आहेत :-

(१) ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० मधील नियम ५ (१) व महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ मधील तरतुदीनुसार लिखित परवानगीशिवाय लाऊडस्पिकर किंवा पब्लिक ॲड्रेस सिस्टीम याचा कोणीही वापर करणार नाही व सदर तरतुदींचा भंग होणार नाही याची योग्य ती दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. ध्वनी प्रदूषण नियमाचा भंग झाल्याचे आढळल्यास ध्वनी प्रदूषण रोखण्यासाठी योग्य ती कायदेशीर कार्यवाही करावी.

(२) ध्वनी प्रदूषणाबाबत तक्रार प्राप्त झाल्यावर संबंधीत ध्वनी प्रदूषण नियंत्रक अधिकारी यांनी सदरहु ठिकाणी ध्वनी प्रदूषण मापक यंत्राने ध्वनीची विहित मर्यादा राखली गेली आहे किंवा कसे याचे परिक्षण करुन या संदर्भात नियमाचा भंग झाला असल्यास ध्वनी प्रदुषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० च्या कलम ७ अंतर्गत योग्य ती कार्यवाही करावी. जर लाऊडस्पिकर किंवा पब्लिक ॲड्रेस सिस्टीम विना परवाना सुरु असल्याचे आढळल्यास ते तात्काळ बंद करावेत. तसेच दिलेल्या वेळेनंतर लाऊडस्पिकर किंवा पब्लिक ॲड्रेस सिस्टीमचा वापर सुरु असल्याचे आढळल्यास तो तात्काळ बंद करावा व असा वापर करणार नाही याची दक्षता घ्यावी.

(३) ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० च्या कलम ८ नुसार संबंधीत प्राधिका-यांनी ध्वनी प्रदूषण नियमाचा भंग झाल्याचे आढळल्यास ध्वनी प्रदूषण रोखण्यासाठी योग्य ती कायदेशीर कार्यवाही करावी.

(४) लाऊडस्पिकर किंवा पब्लिक ॲड्रेस सिस्टीमचा वापर करण्याची परवानगी देताना संबंधिताने यापूर्वी प्रदूषण नियमाचा भंग केला होता किंवा कसे याबाबतची खातरजमा करुनच परवानगी देण्याची कार्यवाही करावी. यापूर्वी संबंधिताने प्रदूषण नियमांचा भंग केल्याचे आढळल्यास अशी परवानगी नाकारण्यात यावी. तसेच लाऊडस्पिकर किंवा

पब्लिक अ‍ॅड्रेस सिस्टीमचा वापर करण्याची परवानगी देण्यात आल्यावर प्रदूषण नियमांचा भंग झाल्याचे आढळल्यास नियमानुसार दिलेली परवानगी रद्द करुन योग्य ती पुढील कायदेशीर कार्यवाही करावी.

(५) ध्वनी प्रदूषणाबाबत मा. उच्च न्यायालयाने दिलेले निदेश सर्व महानगरपालिका तसेच राज्यातील इतर सर्व जिल्ह्याच्या हद्दीतील सर्व पोलीस स्टेशन यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावेत व या परिपत्रकांतील दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन होईल यांची खबरदारी घ्यावी.

(६) ध्वनी प्रदूषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० व महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ च्या तरतुदींची अंमलबजावणी करण्याचे अनुषंगाने खालीलप्रमाणे उपाययोजना कराव्यात :-

i) ध्वनी प्रदूषणाचे उल्लंघनाबाबत सामान्य नागरिकांच्या तक्रारी १०० क्रमांकावर नोंदवून घ्याव्यात. निनावी तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची सुध्दा नोंद घेऊन त्यावर कार्यवाही करण्यात यावी. तसेच तक्रार करणाऱ्यास तक्रार नोंदीचा क्रमांक तात्काळ उपलब्ध करुन देण्यात यावा.

ii) प्राप्त होणाऱ्या तक्रारींची नोंद घेण्यासाठी एक नोंदवही ठेऊन त्यामध्ये तक्रारींची व त्यावर करण्यात आलेल्या कार्यवाहीची नोंद घेण्यात यावी.

iii) ध्वनी प्रदूषणाबाबत तक्रार करण्यासाठी ई-मेल ची सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

iv) उपरोक्त सुविधांची स्थानिक वृत्तपत्रे, स्थानिक केबल नेटवर्क तसेच इतर प्रसार माध्यमांद्वारे प्रसिद्धी देण्यात यावी.

३. केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हादंडाधिकारी व महानगरपालिका आयुक्त यांना त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिद्धीसाठी सादर करावा.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदरहू परिपत्रकातील सूचना सर्व संबंधीतांच्या निदर्शनास आणून देण्यात याव्यात व त्यानुसार त्याचे पालन होत असल्याची खातरजमा करावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०७२८१३५८५०५०२९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jaikumar Sovitkar

Digitally signed by Sunil Jaikumar Sovitkar
DN: CN = Sunil Jaikumar Sovitkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.07.28 16:31:44 +05'30'

( सु. ज. सोवितकर )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे सचिव.
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा.
६. सर्व विधान परिषद / विधानसभा सदस्य.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग.
९. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई. (पत्राने)
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सर्व विभागीय आयुक्त.
१२. सर्व जिल्हादंडाधिकारी.
१३. सर्व पोलीस आयुक्त.
१४. सर्व पोलीस अधिक्षक.
१५. निवडनस्ती (वि.शा.१ ब)